साहित्य प्रतिष्ठान

वर्ष ३ रे
अंक क्र.१०८

नेटाक्षरी

# मराठी अस्मिता



अतिथी संपादक
सुबोध साठे (नागपूर)

यजमान संपादक
स्वप्ना कोल्हे (नाशिक)

संपादक मंडळ
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)
सचिन काकडे (मुंबई)
सारंग भणगे (पुणे)
शशिकांत रणवरे (ठाणे)

नेटाक्षरी

गीतोंने हमें जीना सिखाया
गज़लने मोहब्बत सिखाई है
हर गीत हमारा अपना है
हर गीत हमारी कहानी है..



# ह्या अंकात वाचा

## गाता रहे मेरा दिल -

मराठी युवा पिढीच्या 'अस्मि'तेची ओळख बनलेल्या सुबोध साठे ह्या मनस्वी कलावंताचे मनोगत

## Ding dong..Ohh Baby sing a song -

नवीन प्रतिभावान कवींच्या लेखणीतून साकारलेली काही दिलखेचक मराठी गीतं


नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी netaksharee@gmail.com

# गाता रहे मेरा दिल - अतिथी संपादकाच्या लेखणीतून

संगीत माझा प्राण आहे.माझ्या जगण्यातला आनंद.मी संगीतापासून खुप काळ दूर राहिलो तर नक्कीच ठार वेडा होईल.माझं संगीतापासून  दूर असणं म्हणजे,आयुष्य जगण्यातला आनंदच हिरावून घेण्यासारखं आहे.

असे हे माझे जीवन असलेले संगीत मी शिकावे म्हणून लहानपणी मात्र माझे आई बाबा माझ्या मागे लागायचे.की,‘अरे बेटा तुझ्या आवाजात खुप गोडवा आहे,तू गाणं शिक’.पण त्या वयात मी ते कधीही गांभीर्याने घेतलं नाही.घरी कुणीही पाहुणेमंडळी आली की,मला गाणं म्हणून दाखवायला सांगायचे.त्यांच्या आग्रहाखातर मी म्हणायचो पण मला गाणं म्हणायला अजिबात आवडत नसे.त्यामुळे मी गायन शिकायचा प्रश्नच नव्हता.प्राथमिक शाळेत असतांना असंच सगळयांच्या आग्रहाखातर एका गायनाच्या स्पर्धेत भाग घेऊन मी गाणं म्हटलं होतं आणि आमची शाळा फाईनलला पोहचली होती.माझ्या शाळेतले शिक्षक मला घरी बोलवायला आले होते आणि मी मात्र शेजारच्या घरी जाऊन गच्चीवरुन लपून त्यांची मजा पहात होतो.इतका वैतागायचो मी.
यथावकाश मला सुबोध झाला आणि एकूण ३ महिने मी म्युझिकचा क्लास जॉईन केला.श्री.दत्ता हरकरे ह्यांचेकडे सुगम तर श्री. अनिरुध्द देशपांडे ह्यांचेकडून मी शास्त्रीय संगीत शिकलो.




पुढे,कॉलेजात असतांना माझी गाण्यांच्या बाबतीतली आवड वेगळी होती.मी फक्त प्रायव्हेट अल्बम मधली गाणी म्हणायचो.जसं माईरी,गारवा,पल,हरिहरनचा ‘काश’हा गझलसंग्रह.आणि ही गाणी म्हणून मी इंटर कॉलेज स्पर्धेत ३ वर्ष म्हणजे १९९९-२००१ असं सलग विजेता बनायचा बहुमान पटकावला.मग काही वर्ष अशीच गप्पंगप्पं गेली.पुन्हा हातात गिटार घेतलं ते नवीन गाणी संगीतबध्द करण्याच्या विचाराने.ह्याआधीचा काहीच अनुभव गाठीशी नसल्याने अगदी लहान मुलाप्रमाणे चाली लावणं आणि लोकांना पकडून पकडून ऐकवणं वगैरे प्रकार केले.खुप खुप चूका केल्या आणि त्यातून फक्त थोडं थोडंसं शिकायला मिळालं.माझ्या पहिल्या हिंदी अल्बम साठी मीच शब्दं लिहलेत.५ गाणी लिहलीत आणि मग मात्रं मला वाटलं की,‘नळी फुंकली सोनारे इकडून तिकडे गेले वारे’.हे काम काही आपलं नाही.मग मी खऱ्या अर्थाने २००६ पासून कविता वाचायला,संग्रहित करायला सुरुवात केली.

कविता,गीतं संगीतबध्द करण्या मागचा माझा मुख्य उद्देश हाच होता की मी विचार करायचो की आपण असं किती वर्ष जुनी तीच ती गाणी गात राहणार? त्यात मी कधीच समाधानी राहिलो नसतो किंवा संगीत सोडून तरी दिलं असतं.पण,
आज माझा संगीताशी जिवाभावाचा संबंध फक्त ह्यामुळेच कायम आहे की संगीतक्षेत्रात मी काही तरी नवनिर्मिती करत आहे.

मराठी मधले माझे आवडते संगीतकार आहेत पंडित ह्रदयनाथ मंगेशकर,अजय-अतुल.गायकांमध्ये आशा भोसले,लता मंगेशकर,सुरेश वाडकर.हिंदीत ए.आर.रहमान,आर.डी.बर्मन,हरिहरन.इंग्लिश गायकांत केटी मेलुआ ही रोमॅनियन गायिका(सर्वप्रथम तिच्या आवाजासाठी आणि नंतर तिच्या सौंदर्यासाठी)आवडते.गिटार हे माझे सगळयात आवडते वाद्य आहे कारण तुम्ही हे वाद्य स्वतः गाणं म्हणतांना वाजवू शकता.ह्यामध्ये स्वर आणि ठेका दोन्ही मिळतात.

मला आवडणारे संगीतकार,गायक जरी असले तरी माझी प्रेरणा मात्र मीच आहे.मी कुठल्याही संगीतकाराला फॉलो करत नाही.खरंतर कुणी जर मला एखाद्या लोकप्रिय गाण्याचा संगीतकार कोण असं विचारलं तर तेदेखील मी सांगू शकणार नाही.कानावर आपसूक जी गाणी पडतात तेवढंच माझं गाणी ऐकणं.कारण,मला कधीच सीडी,कॅसेट घेऊन तासनतास गाणी ऐकणं जमलं नाही.काहीतरी नवीन करुन पहातांना मी निवडलेलं काम श्रवणीय होत गेलं आणि मी करत गेलो.

माझे आई बाबा हसून म्हणतात,आधीच गायन शिकला असतास तर अधिक चांगला गाऊ शकला असतास.मी काही तरी नवीन आणि स्वतःला आवडतंय ते करतोय म्हणून मित्रं जाम खुश आहेत.कारण,आजच्या मनी माइंडेड युगात सर्व युवापिढीचा शिक्षण झाल्यानंतर मोठ्या पगाराची नोकरी मिळवणं हाच एकमेव हेतू जीवनध्येय बनून जातं.त्यात जिथे स्वतःच्या आवडी निवडी जोपासायचा विचारदेखील परवडत नाही.तिथे मी मात्र मला आवडत्या क्षेत्रात सक्रिय आहे,यशस्वी आहे त्यामुळे मित्रांना माझे खुप कौतुक वाटतं.

२०११ मध्ये मी सॉफ्टवेअर कंपनीतली नोकरी सोडून देऊन म्युझिक बँड तयार करायचा ह्या एकमेव उद्देशाने अक्षरशः झपाटलो होतो.‘अस्मी ’ या संस्कृत शब्दाचा मराठी अर्थ ‘अस्तित्व’असा आहे.आणि मराठी म्युझिक बँडचं अस्तित्व आहे हेच जगाला सांगण्याच्या हेतूने आम्ही हा ‘अस्मी’ म्युझिक बँड तयार केला.




नवीन संगीत,नवीन फॉर्मेट मध्ये लोकांना ऐकवायचं आहे.त्यासाठी श्रोते तयार करण्यापासून सुरुवात करावी लागणार हे माहीत होतं.ही खुप मोठी रिस्क आहे पण करायचंच असं ठरवलं आणि म्युझिक बँड तयार केला.मला संगीतकार अभिषेक पाठक आणि राम बावनकुळे भेटलेत. त्यांना मी माझी कल्पना सांगितली आणि ते मला सामील झाले.काही गाणी गेल्या वर्षीच संगीतबध्द केली होती पण त्यानंतर मोठा ब्रेक घेतला होता. आम्ही ऑडिशन्स घेऊन ड्रमर(ब्रेट डिसूझा)आणि गिटारिस्ट(गौरव टाकसाळे)ह्यांची निवड केली,मग बेस गिटारिस्ट(रिंकू)पण मिळाला.अशा प्रकारे आम्ही ६ जणांनी मिळून १८ ऑगस्ट २०११ मध्ये नागपूरमध्ये आमच्या म्युझिक बँडचा पहिला शो सादर केला ज्याला प्रचंड प्रतिसाद मिळाला.

आमची वेबसाईट www.asmiband.com येथे तुम्ही आमचे म्युझिक व्हिडीओज देखील पाहू शकता.२७ सप्टेंबर २०११ ला नागपूरात आमचा अल्बम लाँच आणि live concert आहे. ऑक्टोबरमध्ये पुण्यात पहिला शो,मग मुंबईत.परदेशातल्या मराठी बांधवांसमोरही आमच्या अस्मी म्युझिक बँड चे शो करायला मला प्रचंड आवडेल. मला आमच्या म्युझिक बँडला घेऊन वर्ल्ड टूर करायचे आहे.देशोविदेशी आमचे शो व्हावेत अशी माझी खुप इच्छा आहे. मराठी म्युझिक बँड हा फक्त मराठी गीतांपुरताच मर्यादित न ठेवता मला तो सर्वसमावेशक करायचा आहे.त्यात हिंदी गाण्यांचा देखील अंतर्भाव करायचा आहे. अस्मी संगीतासह शब्दांचे मोल राखणारा म्युझिक बँड आहे.आमचे स्थान आम्हाला ध्रुव ताऱ्याप्रमाणे अढळ करायचे आहे.मुश्किल जरुर है,नामुमकीन नहीं.

आमचे गीतकार संतोष बडगुजर(पुणे),हर्षल पाटील(पुणे)आणि मधुसूदन नानिवडेकर(कोकण)आहेत.आमच्या म्युझिक बँड साठी नवीन कवींच्या वृत्तातल्या आणि ट्रेंडी विषयावरच्या कवितांचे स्वागत आहे.आमचा अस्मी म्युझिक बँड हा जरी मराठी म्युझिक बँड असला तरी आमच्या गाण्यांमध्ये आम्ही इंग्लिश आणि हिंदी भाषेचाही वापर केला आहे.उदाहरणादाखल'I am in Love,I became Lonely,बार बार देखो' हे देता येईल.माझ्या पर्सनल वेबसाईटवर तुम्ही २ हिंदी आणि ३-४ मराठी अल्बम्स विनामूल्य ऐकूही शकता.आजपर्यंत मी सीडी काढण्याचा विचार केला नव्हता पण अधिकाधिक लोकांपर्यंत संगीत पोहचवण्याचा सीडी हादेखील एक उत्तम मार्ग आहे हे मला जाणवले.

मी आजपर्यंत अनेक गाणी गायलीत,जीव ओतून गायलीत.त्यांना मी पुरेपुर न्याय दिला पण 'हसतांना प्राण गेला' हे सुरेश भट लिखीत गाणं मी अजून चांगलं गाऊ शकलो असतो असे मला वाटते.असो..सध्याच्या आवृत्ती मधील भाव देखील तसे मला खुप आवडतात.कधी प्रत्येक गाणंच अवघड वाटतं,कधी चाल लवकर सुचते तर कधी नाही.चाल लागेल हे माहिती असतं पण श्रवणीय आणि वेगळी चाल लावणं हे एक आव्हान असतं.हे माझ्या बाबतीत नेहमीच असतं.




'जुनं ते सोनं आहे' हे मान्य पण त्याचबरोबरच संगीत क्षेत्रात नवनवीन प्रयोगदेखील होत राहिले पाहिजेत असे माझे आग्रही मत आहे.माझ्या मराठी अल्बम्सचे संगीत हे ८०% पाश्चात्य संगीत पध्दतीचे आहे.ते ऐकतांना श्रोत्यांना काहीतरी नवीन,टवटवीत ऐकल्याचा अनुभव मिळतो.नाहीतर बऱ्याचदा काय होतं की,चांगले संगीत देखील त्यात तोच तो पणा आल्याने शिळे होऊन जाते,रटाळ वाटते.मराठी कवितांचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे.मी स्वतः किमान २० नवोदित गुणी कवींना ओळखतो,त्यांच्या कवितांचा मी चाहता आहे.

नेटाक्षरीच्या ह्या अंकामध्ये अशाच काही नवीन प्रतिभावान कवींच्या गीतांचा समावेश आम्ही करत आहोत.लोकांना नवीन आणि श्रवणीय गाणी आवडतात.खास करुन नव्या मराठी भाषिक पिढीची संगीतातली आवड लक्षात घेता त्यांना जर bollywood आणि pop music आवडत असेल तर मराठीत देखील तशी संगीतनिर्मिती व्हायला पाहिजे.तशी गाणी मराठीत देखील आली पाहिजेत.ती होतील आणि लोकांना आवडतील सुध्दा.

कविता ही भावनांची अभिव्यक्ती असते.ती मीटरमध्येच लिहली जावी असे बिल्कुल नाही.पण,जर कवितेला चालबध्द करण्याचा कवीचा हेतू असेल तर त्याला भावनांना मीटरमध्ये बंदिस्त करावंच लागतं.कारण,प्रत्येक संगीतकार सिध्दहस्त असेलच असं नाही.कवीच्या उत्स्फूर्त भावनांचा प्रवाह कसाही असू शकतो.माझ्या मते कुठल्याही कवितेला चाल देता येऊ शकते पण मध्ये बेचाल लागल्यावर कवितेच्या आशयात फारसे बदल न करता शब्दांत फेरबदल करून कविता मीटर मध्ये बसवता येऊ शकते,त्या कवितेला संगीत आणि स्वराचा साज चढवता येऊ शकतो आणि तिचे लावण्य अधिक खुलवता येऊ शकते.प्रत्येक गाण्याला काहीनाकाही मीटर असतंच उदा.'मेरा कुछ सामान तुम्हारे पास पडा है' हे गुलजारसाहेबांचं अप्रतिम गाणं जर तुम्ही स्वतः गायलात तर लक्षात येईल की ते मीटर मध्ये नाहीये पण शब्दंच असे पेरलेले आहेत की ते चालीत चपखल बसतात.



माझा 'अजूनही कळेचना'अल्बम वेबसाईटवर जानेवारीत रिलीज झाला.मार्च मध्ये ते गाणं एका प्रोड्युसरने ऐकलं आणि माझ्या परवानगीने नंतर ते एका हिंदी चित्रपटासाठी प्रसिध्द गायक कुणाल गांजावालाच्या आवाज रेकॉर्ड केलं.ते रेकॉर्डिंग बघण्याचा प्रसंग निव्वळ अविस्मरणीय होता.आपलं गाणं टॉपचा गायक गातोय आणि ते देखील फुकटात,क्या बात है.ह्या गाण्यात मनोहारी लाल हे आर.डी.बर्मन ह्यांचे music arranger आणि sexophone player ह्यांनी sexophone वाजवलाय.दुर्दैवाने,हा सिनेमा डब्ब्यात गेल्याने ते गाणं लोकांपुढे आलं नाही ह्या गोष्टीची खंत मला सदैव राहील. जी गोष्ट तुम्हाला प्रिय आहे त्यासाठी वेळ द्यायला कुणालाही आवडेल आणि अजूनपर्यंत तरी संगीत हे काही माझं उपजिवेकचं साधन नाहीये.झालं तर नक्कीच आवडेल आणि त्या दिशेने माझे प्रयत्न पण सुरु आहेत.

आजकाल जो पहावा तो शर्यतीत आहे.दुसऱ्यांपेक्षा अधिक पैसा कमावण्याच्या म्हणा,यश मिळवण्याच्या शर्यतीत म्हणा.जन्माला आल्यापासून ही शर्यत जीवनाचा एक अविभाज्य भाग बनून जाते,तुम्हाला हवं असो किंवा नसो.मी स्वतः शर्यतीत आहे असं म्हणायला हरकत नाही.माझ्याकडे तरी यशाचा असा कानमंत्र नाही पण असं मला वाटतं की युवा पिढीने नेहमी नव्याचा ध्यास धरावा.काहीतरी नवीन करावं.नवीन मार्ग,नवीन प्रयोग...सर्वच क्षेत्रात.मी स्वतःदेखील काहीतरी नवीन करतोय आणि मला थोडा का होईना प्रतिसाद मिळतोय,माझ्यासाठी 'मी' यशस्वी आहे.सांगणं फार सोप्पं आहे पण करणं आणि अनुभवणं तेवढंच कठीण.

मला असं वाटतं की,रुळलेल्या वाटेवरुन चालणं म्हणजे नोकरी एके नोकरी करणं वाईट नाही पण त्याव्यतिरिक्त जर तुम्ही आयुष्यात काहीतरी नवीन करु शकता तर उडी घ्यायलाच पाहिजे.पण सगळेच लोकं ह्या पध्दतीतले नसतात.काही लोकांचं आयुष्यभर नोकरी करणं हे देखील स्वप्नं असू शकतं आणि त्यांचं स्वप्न चांगलं अथवा वाईट आहे असं म्हणणारे आपण कोण ?

नेटाक्षरीचे मला ह्यासाठीच कौतुक आहे की ते साहित्यक्षेत्रात नवनवीन वाटा चोखाळत आहे.मराठी कवितांना जागतिक व्यासपीठावर दमदारपणे सादर करणारे नेटाक्षरी हे लोकप्रिय ई मॅगझिन बनले आहे ते ह्याचमुळे. मला नेटाक्षरीच्या अतिथी संपादकपदाचा बहुमान दिल्याबद्दल स्वप्ना आणि ई साहित्य प्रतिष्ठानचे मी मनःपूर्वक आभार मानतो व पुढील वाटचालीसाठी अनेकानेक शुभेच्छा देतो. मराठी अस्मिता अशीच फुलत बहरत राहो हीच मनोकामना.

- सुबोध साठे (नागपूर)




## अतिथी संपादकाची ओळख –

सुबोध प्रकाश साठे

BFA (commercial Artist)
Web designer & Lifestyle photographer
Model, Photographer,Composer & Singer
Founder of Timeplease Club,Nagpur

To know him more visit : www.subodhsathe.com

# Ding dong..Ohh Baby sing a song..

* * भंपऽप भपम भपम * *



भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम
वेगात जाऊ म्होरं,सुटलेला जसा तीर
राख़ेल काय कुणात काही दम
रंगेल सारे जग,आपुल्या रंगातून
एकेक पडूदे कदम,रे कदम
भंपऽप भपम
नवीन आमुची ही गाणी रे
नवीन आमुचा हा सूर
पटली तर द्या हाताला टाळी रे
नाही तर हटा जरा दूर
आले रे वारे,आरुढ व्हारे
पसरवूया आपुले तरंग रंऽग रंऽग रंऽग
भंपऽप भपम
नव्याने मापे जुनी तोलूया
येते का पहा तिथे घट
फुटलेल्या कंठाने बोलूया
उपयोगी नाही कुजबूज
खोट्या जगाची,कोत्या दुनियेची
उडवूया चला दाणादाण दऽण दऽण दऽण दऽण
भंपऽप भपम
प्रिझमातून इंद्रधनु सारुया
दावुया एक कसा रंग
दगडातून देवाला काढूया
घेऊया त्यालाही संग
कसली रे भिती,रोखठोक निती
मिरवा या ध्वजाचे पतंग तऽंग तंऽग तऽंग
भंपऽप भपम
मिटलेल्या दारांना दे धडक
वारे हे आत घुम घुमू दे
मेघांना गीत द्या हे बेधडक
बरसू दे आणि गडगडू दे
वाजव रे घंटा,पिटवूया डंका
होऊ दे नाद जरा घऽण घऽण घऽण
भंपऽप भपम

- कौस्तुभ आपटे (मुंबई)

Where words fail..music speaks

* * मधुधुंद गंध,बेधुंद हवा * *

मधुधुंद गंध,बेधुंद हवा
मोरपिशी स्पर्श नवा
सोड ना हात साजणा
मंद कर ना रात दिवा

किणकिणतो बघ चुडा
चांदण्यांचा शेज सडा
नजरेचे भलतेच इशारे
श्वासांचा आवाज चढा

शाश्वतीचे वरदान असे
या क्षणांना चढलेय पिसे
बेभान मदमस्त निशेत
देहभान सांग का नसे?

काजळ अलवार विखुरले
स्वप्न समीप अवतरले
चढत्या भावनांचे काहूर
बाहुपाशात तुझ्या निवळले
बाहुपाशात तुझ्या निवळले

- रेणुका खटावकर रेपाळ (अमेरिका)



Music & Rthythm find their way into the secreat places of the soul

## * * तुज एकांती स्मरतांना * *

तुज एकांती स्मरतांना
सावल्या लागती मागे
निःस्तब्ध होतसे सांज
तुटतात सावळे धागे

तुटण्याची सुन्न भाषा
सहज मलाही कळते
आलिंगन गहिवरलेले
डोळयातूनी पान गळते

दचकूनी थांबतो वारा
त्याच्याही येते  ध्यानी
मघा उडविला पाचोळा
राहिले तसेच पाणी

पाण्यातूनही अंधार
ना ओल दिसे ना दिवा
दग्धता गूढ तळाशी
शोधत फिरे काजवा

ती भिरभिर फिरतांना
चांदणे येतसे खाली
सरकती मेघही पुन्हा
अंधार पुन्हा भवताली

या अंधारातही कैसा
कवितेला हट्ट सुचतो
स्वरनक्षत्र मागते भोळी
माझाही तोल सुटतो

- सचिन काकडे (मुंबई)



If the music is too loud..You are too old

* * राजसा * *

झोप माझ्या राजसा रे
रात्र झाली फार आता
सैल झाली ही मिठी
अन संपला मल्हार आता

मोगऱ्याच्या पाकळीला पेंग आली मारव्याची
सांडला प्राजक्त सांगे तृप्त रे गंधार आता

रक्तमा प्राशून माझ्या गीत ओठी गुंफले तू
मौन गाणे हे तुझे रे होतसे साकार आता

यौवनाची मालकंसी रंगलेली रात सारी
मुग्धस्पर्शी चांदणेही हाय झाले पार आता

झोप माझ्या राजसा रे
रात्र झाली फार आता
सैल झाली ही मिठी
अन संपला मल्हार आता

- अनुजा मुळये (पुणे)



Life is one grand sweet song..so start the music

* * तुझ्यावरती * *

एक तुझ्या असण्यावरती
एक तुझ्या नसण्यावरती

आज गीत गातो आहे
एक तुझ्या हसण्यावरती

साथ आहे जन्माची
सुखाची अन दुःखाची

विणली आहे मैत्री नी न तुटणाऱ्या धाग्यावरती

मनात उधळण रंगांची
स्वप्नांमधल्या शब्दांची

साथ सुरांची असता येते
गाणे तुझेच ओठांवरती

एक तुझ्या असण्यावरती
एक तुझ्या नसण्यावरती

आज गीत गातो आहे
एक तुझ्या हसण्यावरती

- हर्षल पाटील (हैदराबाद)




Music can name the unnamable & communicate the unknowable

* * पाऊस असा कोसळतो * *

पाऊस असा कोसळतो
एकांती जीव जळतो
रंग धुंद धुंद
गंध कुंद कुंद
एकांती जीव तडफडतो
तळमळतो,जळतो
पाऊस असा कोसळतो

घन गडाड गड
वीज कडाड कड
गंधार नभी घुमतो
अंधार चिंब डसतो
कोसळतो, पाऊस असा कोसळतो,एकांती जीव जळतो

तन चूर चूर
मन पूर पूर
विरह उरी चुभतो
शृंगार उगी पाहतो
कोसळतो, पाऊस असा कोसळतो,एकांती जीव जळतो

वाट पाही पाही
साथ नाही नाही
सरण हे रचतो
मरण रे मागतो
कोसळतो, पाऊस असा कोसळतो,एकांती जीव जळतो

- स्वप्ना कोल्हे (नाशिक)



* * मन कावरं बावरं * *

मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी
तुझा एक एक शब्द माझी गीता माझी पोथी

तुझा हुंकार झंकार
जशी सरस्वती वीणा
तुझ्या वाणीचा गोडवा
वेणू मधुबन कान्हा
तूच पाठराखी माझी तूच माझी आदिशक्ती
मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी

डोळे यातना व्याकूळ
पाणी माझ्या काळजाचं
वाट दिसता दिसेना
जसं नभ मळभाचं
गळपटलेले पाय शून्य वजाबाकी हाती
मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी

असा यल्गार मांडला
आकांताने फोडी टाहो
तरारले अश्रू मनी
पान्हा पत्थराला लाहो
सारा लिलाव मांडला होते नव्हते ते गाठी
मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी

मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी
तुझा एक एक शब्द माझी गीता माझी पोथी

- नाम गुम जायेगा (ठाणे)




Without music,life would be a mistake

* * कसे दूर जाणे मनाला जमावे * *

कसे दूर जाणे मनाला जमावे ?
कुठेही पहाता मला तू दिसावे..

प्रिये,जीव घेऊन गेलीस माझा
कसे शब्दं वेडे मनाचे जुळावे ?
कसे भाव माझे तुला ते कळावे ?

तुझे श्वास मोजून मापून घेणे
अता मोगऱ्याने कशाला फुलावे ?
कसे गंध सारे तुला ते कळावे ?

कधी मी जरासा दिशाहीन होतो
तू होऊन माझे जगाला भुलावे
कुठेही पहाता मला तू दिसावे

कसे दूर जाणे मनाला जमावे ?

- आनंद माने (सोलापूर)



Music is the prayer the heart sings

# Music is the moonlight in the gloomy night of life



मराठी साहित्य रसिकांना नेहमी उत्तमोत्तम व नाविन्यपूर्ण साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे.दरवेळी ईमेलने येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतो.ह्याच प्रोत्साहनाच्या बळावर नेटाक्षरीने हल्लीच आपला शतकोत्सव साजरा केला.हा अंक सध्या सुमारे ९५००० रसिकांना ईमेलने मोफत वितरीत केला जातोय.सोबतच मागील सर्व प्रकाशित अंक वाचण्यासाठी www.esahity.com ह्या आमच्या संकेतस्थळाला भेट देणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.

हे अंक तुम्ही आपल्या फ्रेंडलिस्टला Fwd करुन त्यांनाही ह्या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे हा आमचा प्रेमळ आग्रह.

त्याच ईमेलची cc netaksharee@gmail.com वर आम्हाला दिल्यास पुढील अंक आम्ही त्यांनाही नियमित पाठवत राहू.मराठी भाषेची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यास आपला हातभार लागावा असे कुठल्या मराठी भाषिकास नाही वाटणार ?ह्याच विश्वासाच्या बळावर आपल्यासारख्या दर्दी रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचाही पल्ला पार करील अशी आम्हांला खात्री आहे.

आमची इतर ई प्रकाशने –
विनोदाचा दादा-ई स्टॉप,कवितांचा आवाज-स्वर नेटाक्षरी,
मुलांचा नेट प्रवेश-बालनेटाक्षरी,महाराष्ट्राचं वैभव-दुर्ग दुर्गट भारी

आमची प्रकाशित ई पुस्तके –
टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,
चार क्षण,तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान,
ई शाळा,तो मी आणि सिगरेट,मोरया,लोकल गोष्टी,
मीरा(मराठी अनुवाद),ओथंब,सावळ्या मुलीची गाणी,
सईची वही,लालनाक्या,ओथंब २,कृष्णा,व्याख्या प्रेमाची



नेटाक्षरी